**राज्य योजना सन २०१४-१५**
**निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (वन्यपशू व निसर्ग संरक्षण) बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१४/प्र.क्र.१९८/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नगापूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.६९/(२०१४-१५)/८०८, दिनांक :- ०७.०८.२०१४.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-वजी/२२(६)/यो./प्र.क्र.३९/१४४४/१४-१५, दिनांक :- २१.०७.२०१४.
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०२.०१.२०१५ व दिनांक ०९.०२.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात राज्य योजनेंतर्गत निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (वन्यपशू व निसर्ग संरक्षण) (२४०६ ०७७५) या योजनेकरीता सन २०१४-१५ मध्ये रुपये २५.०० लक्षचा नियतव्यय मंजूर असून रुपये १७.५० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता सन २०१४ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रु. ७.५० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे असा एकूण रु. २५.०० लाख निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. त्यानुसार अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नगापूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी नागपूर वनवृत्ताकरीता वन्यप्राणांचे प्रजातिनुसार बंदिस्त करण्यासाठी एकूण ३९ पिंजरे तयार करण्याकरिता रु. १७.४४ लक्ष व जखमी प्राणी उपचारार्थ औषधी व अनुंषगीक साहित्य खरेदी करण्यारीता रु. ७.५६ लक्ष असे एकंदर रु. २५.०० लक्षच्या प्रस्ताव संदर्भ क्रमांक १ व २ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

३. वित्तविभाग दिनांक ०२.०१.२०१५ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६०% मर्यादेत निधी वितरीत करण्याचे आदेश आहेत तसेच दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार सन २०१४-१५ मध्ये योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधीपैकी ७५% निधी खर्च करण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत.

४. निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (वन्यपशू व निसर्ग संरक्षण) या योजनेसाठी वित्त विभागाच्या दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार उर्वरित रु.१८.७५ लक्ष निधी खर्च करण्यास खालील अटींवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१४-१५ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन ११०, वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०९.०२.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१५०५५८६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.25 15:16:34 +05'30'

( अरविंद आपटे )
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.
५. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
६. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१४/प्र.क्र.१९८ /फ-१, दिनांक:- २५.०२.२०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-०७७५ | अर्थसंकल्पित निधी | फेब्रुवारी, २०१५ | मार्च, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ | ७ |
| १ | ५०-इतर खर्च | २५.०० | १०.०० | ८.७५ | १८.७५ |

****